**कोने ल. पा. प्रकल्प ता. त्र्यंबक, जि. नाशिक प्रकल्पाच्या डाव्या व उजव्या कालव्याच्या दुरूस्तीच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.७/२०२२)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: ३० मार्च, २०२२

वाचा:-

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम-/सिंचन-१/ धा-२३८ /वि.दु.अं./ १०५४८/ २०२१ दि. १६/१२/२०२१.
२. शासन निर्णय - २०१७/(५६६/१७)/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/(५५१/१७)/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे) दि १/१/२०१५.

प्रस्तावना:-

लघु पाटबंधारे प्रकल्प कोने हा गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ , औरंगाबाद अंतर्गत आहे. सदर प्रकल्प नाशिक जिल्हयातील त्रयंबकेश्वर तालुक्यात असुन नाशिक पासून ३७ कि. मी. अंतरावर कोने गावाजवळील गोदावरी खो-याच्या कश्यपी उपनदीवर आहे. प्रकल्पाची ५० % विश्वासाहर्यतेनुसार एकूण जलनिष्पती १९.६० दलघमी असून प्रकल्पाचा एकूण पाणीसठा २.१०७ दलघमी आहे. सदर प्रकल्प सन १९८५-८६ मध्ये पूर्ण असुन प्रकल्पावर सिंचन सुरू आहे. प्रकल्पाचे लागवडी लायक क्षेत्र २१५ हेक्टर असुन सिंचन क्षेत्र १७२ हेक्टर आहे. योजनेस ४ कि. मी. लांबीचा उजवा कालवा व ४ कि. मी. लांबीचा डावा कालवा आहे.सदर प्रकल्प पुर्ण होऊन अंदाजे ३५ वर्षापेक्षा अधिक काळ लोटला असून प्रकल्प अतिवृष्टीच्या प्रदेशात मोडत असल्याने पावसाळयात नदी-नाले ओसंडून वाहतात.सदर प्रकल्पाच्या ठिकाणी नदी नाल्यांच्या पूरप्रवाहामुळे डाव्या व उजव्या कालव्याच्या भरावाचे नुकसान झालेले असुन ब-याच ठिकाणी कालव्यांचे भराव फुटलेले आहेत. त्यामुळे डावा कालवा मागील १० वर्षापासुन व उजवा कालवा मागील ३० वर्षापासुन बंद असुन त्यामुळे प्रकल्पावर पिण्याच्या पाण्याचा व सिंचनाचा प्रश्न निर्माण झालेला आहे. तसेच प्रकल्पाच्या कालव्यांवरील बांधकामे सन १९८५ मधील असुन सदर बांधकामे दगडी बांधकामात असल्याने व सदर बांधकामास ३५ वर्षापेक्षा जास्त काळ लोटल्याने बांधकामे पूर्णपणे जीर्ण झालेली असुन त्यांची पडझड झालेली आहे. सबब, प्रकल्पावरील सिंचनक्षेत्र पुनर्स्थापित होणेस्त्व व प्रकल्पावर पाणी वापर संस्था कार्यान्वित होणेस्त्व खालीलप्रमाणे दुरूस्ती कामे प्रस्तावीत करणे आलेली आहे.कोने ल. पा. प्रकल्प ता. त्रयंबक, जि. नाशिक प्रकल्पाच्या डाव्या व उजव्या कालव्याच्या दुरूस्तीच्या अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत कोने ल. पा. प्रकल्प ता. त्रयंबक, जि. नाशिक प्रकल्पाच्या डाव्या व उजव्या कालव्याच्या दुरूस्तीच्या अंदाजपत्रकास या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या रू. **३,२४,७७,७६६** /- (रू. तीन कोटी चोवीस लक्ष सत्याहत्तर हजार सातशे सहासष्ट फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता ,निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय /परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन,निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लहान पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण,१९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती/विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अनुदान (००)(१८) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र)(कार्यक्रम) (४७०२ ७४८१) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ५७ सन २०२१-२०२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१५०३३०२५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.03.30 15:05:52 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,

९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

१४) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग ,उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक

१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नाशिक,

१७) कार्यकारी अभियंता, नाशिक पाटबंधारे विभाग ,नाशिक

१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.७/२०२२)/ सिंव्य (कामे),**

**दि. ३०/०३/२०२२ चे सहपत्र**

| अ.क्र. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 23634362 |
| 2 | Royalty | 5061906 |
| 3 | १ % Insurance | 236344 |
| 4 | १२ % GST | 2836123 |
| 5 | ३ % Contingencies | 709031 |
| | **Total Rs.** | 3,24,77,766 |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.03.30 15:06:12 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**